**सार्वजनिक बांधकाम विभागामधील सर्व क्षेत्रीय कार्यालयांमधील अस्थायी पदांना दि.१ मार्च २०१७ पासून दि.३० सप्टेंबर २०१७ पर्यंत मुदतवाढ मिळणेबाबत ......**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. सीओएन-२०१७/प्र.क्र.०७/प्रशासन-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि. ०९ मार्च, २०१७

संदर्भ :-१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र. सीओएन-२०१६/प्र.क्र.८९/प्रशासन-१ दि. ७ ऑक्टोबर २०१६
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि -२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.१० फेब्रुवारी २०१७

**शासन निर्णय :-**

उपरोक्त क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागामधील क्षेत्रीय कार्यालयांमधील अस्थायी पदांना दि. ०१ ऑक्टोबर २०१६ पासून दि. २८ फेब्रुवारी २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. उपरोक्त संदर्भाधीन क्र. २ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि. ०१ मार्च २०१७ पासून दि. ३० सप्टेंबर २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत. त्यानुषंगाने संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागामधील क्षेत्रीय कार्यालयांमधील दि. ०१ ऑक्टोबर २०१६ पासून दि. २८ फेब्रुवारी २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेल्या अस्थायी पदांना ती सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाहीत, या अटीच्या अधीन राहून दि. ०१ मार्च २०१७ पासून दि. ३० सप्टेंबर २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यास शासन मंजुरी देत आहे.

३. दि. २५ नोव्हेंबर २००४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत स्थापत्य शाखेतील क्षेत्रीय स्तरावरील नियमित संवर्गापैकी ३४ संवर्गातील पदांचा आणि दि. २२ फेब्रुवारी २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये उर्वरित ३५ पासून पुढील संवर्गातील पदांचा सुधारित आकृतिबंध निश्चित करण्यात आलेला आहे. या शासन निर्णयामधील तरतूदी / सूचनांचे पालन करण्यात यावे.

४. या बाबीवरील खर्च :-

**अ)** मंडळ कार्यालयातील पदांसाठी २०५९-सार्वजनिक बांधकामे ८०-सर्वसाधारण, ००१-संचालन व प्रशासन (चार) पर्यवेक्षण (योजनेतर)

**ब)** विभाग / उपविभागांतर्गत पदांसाठी २०५९-सार्वजनिक बांधकामे , ८०-सर्वसाधारण-००१-संचालन व प्रशासन (पाच) कार्यान्वयन (योजनेतर)

**क)** संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी मुंबई यांच्या अधिपत्याखालील मंडळ कार्यालयातील पदांसाठी २२१७-नगर विकास, २२१७०२३४-००१-१ संचालक, बी.डी.डी. चाळी, ०१ वेतन

**ड)** संचालक, उपवने व उद्याने, मुंबई यांच्या अधिपत्याखालील पदांसाठी २४०६-वनीकरण व वन्यजीवन - ०२- पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन - ११२- सार्वजनिक उद्याने (१) अधीक्षक, उपवने व उद्याने (२४०६०८०१)

**इ)** अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), कोकण भवन, नवी मुंबई या मंडळ कार्यालयातील एक शिपाई पदासाठी ३०५१ बंदरे व दिपगृहे ०२, लहान बंदरे १०२, बंदर व्यवस्थापन (०१), वेतन (०३), प्रवास खर्च (०५) , कार्यालयीन खर्च मागणी क्र. ४ या लेखाशिर्षाखाली असून उर्वरित अस्थायी पदांकरिता २०५९-सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधाण, ००१-संचालन व प्रशासन दोन संकल्पचित्र (०१) वेतन (०३), प्रवास खर्च (०५), कार्यालयीन खर्च (योजनेतर) मागणी क्र. एच-६ संगणक क्र. २०५९०६२३

या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि -२०१६ / प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.१० फेब्रुवारी २०१७ या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३०७१७५०४९४८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Gokul Bhagwan Shinde

Digitally signed by Gokul Bhagwan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7a4fc0f5ecbc7162f8262abc6fa78dfd704372f8b2916f497a897c91464c442d, cn=Gokul Bhagwan Shinde
Date: 2017.03.09 16:19:56 +05'30'

**( गो. भ. शिंदे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई
३. महालेखापाल-२ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४.महालेखापाल-२ ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५.सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ
८. सर्व अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ
९. सर्व अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ

१०. अधीक्षक अभियंता, दक्षता पथक मंडळ, मुंबई
११. अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल व इमारती), नवी मुंबई
१२. अधीक्षक अभियंता, मुंबई बांधकाम मंडळ, चेंबूर
१३. अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, नवी मुंबई
१४. किनारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
१५. उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, पुणे, नागपूर, औरंगाबाद
१६.संचालक, मुंबई विकास विभाग चाळी, वरळी, मुंबई
१७. सर्व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग
१८. सर्व कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद
१९. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत
२०. संबंधित कोषागार / उपकोषागार अधिकारी
२१. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२३. वित्त विभाग (अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई
२४. गृह विभाग (टीआरए-५), मंत्रालय, मुंबई
२५. वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय, मुंबई
२६. वित्त विभाग, (वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई
२७. कार्यासन अधिकारी, सेवा-४, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
२८. कार्यासन अधिकारी, प्रशासन-१, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).